



**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,मंत्रालय मुख्य इमारत ,पहिला मजला ,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२**
दुरध्वनी क्र. ०२२-२२०४८२४७ Email ID : dokh.rfd@maharashtra.gov.in

---

क्रमांकः-गौखनि-३७/०८२२/प्र.क्र.५७/ख-१ दिनांक :-२८ जून, २०२३.

**विषय : गौण खनिज-सोलापूर**
भिमा नदीपात्रातील मौजे घोडेश्वर-तामदर्डी, साठा क्र.१, ता.मोहोळ-मंगळवेढा या वाळूगटाच्या लिलावाची रक्कम परत मिळणेबाबत.
**मे.चौधरी पॉवर प्रोजेक्ट प्रा.लि.**

**संदर्भः**-जिल्हाधिकारी, सोलापूर यांचे क्र.मशा/कार्या-१/गौख/प्र.क्र.४२/आर.आर-२२६८/२२ दि.१५/०७/२०२२ चे पत्र.

**शासन ज्ञापन:**

भिमा नदीपात्रातील मौजे घोडेश्वर-तामदर्डी, साठा क्र.१, ता.मोहोळ-मंगळवेढा हा वाळूगट लिलावधारक चौधरी पॉवर प्रोजेक्ट प्रा.लि., यांना रक्कम रु.३,५३,३५,०००/- इतक्या सर्वोच्च बोलीस जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी दि.६/५/२०२२ च्या आदेशान्वये मंजूर केला होता. तथापि, लिलावधारक यांनी वाळूगटाच्या लिलावाची संपूर्ण रक्कम शासन जमा करुन व लिलावधारक यांचे नावे पर्यावरण अनुमती वर्ग होऊन सुध्दा मौजे घोडेश्वर-तामदर्डी साठा क्र.१ या वाळूगटामध्ये पाणी असल्याने मा.राष्ट्रीय हरित लवाद, नवी दिल्ली यांनी पारीत केलेल्या आदेशाचा अवमान होणार नाही, याची दक्षता म्हणून सदर गटाचा ताबा लिलावधारक यांना देण्यात आलेला नाही.

०२. सबब, सदर प्रकरणी जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी सादर केलेला अहवाल, जिल्हास्तरीय समितीचे अभिप्राय तसेच, वाळू /रेती निर्गती धोरण दि.२८/१/२०२२ मधील प्रकरण क्र.बारा (१)(१)(अ) तरतूद विचारात घेता, मौजे घोडेश्वर-तामदर्डी साठा क्र.१, ता.मोहोळ-मंगळवेढा या वाळूगटाच्या लिलावाची शासनजमा केलेली रक्कम रु.३,५३,३५,०००/- (रुपये तीन कोटी त्रेपन्न लाख पस्तीस हजार फक्त) लिलावधारक चौधरी पॉवर प्रोजेक्ट प्रा.लि. यांना अदा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०३. लिलावधारक मे.चौधरी पॉवर प्रोजेक्ट प्रा.लि. यांनी सन २०२१-२२ या वर्षाकरीता भिमा नदीपात्रातील मौजे घोडेश्वर-तामदर्डी, साठा क्र.१, ता.मोहोळ-मंगळवेढा या वाळूगटाच्या लिलावाची संपुर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर लिलावधारक मे.चौधरी पॉवर प्रोजेक्ट प्रा.लि. यांना शासनजमा केलेली लिलावाची रक्कम रु.३,५३,३५,०००/- (रुपये तीन कोटी त्रेपन्न लाख पस्तीस हजार फक्त) अदा करण्यास या ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०४.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता ०८ ५३- अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२- खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०५.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३/२०२३/व्यय-९, दि.२३/१/२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०७०६११३०४७५९१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2023.07.06 11:32:29 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, सोलापूर

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.

३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई- ४०० ०२०.

४) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर

५) वित्त विभाग (व्यय-९/ अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७) निवडनस्ती (कार्यासन ख-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.